**महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेवर नवीन अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक जसंप २०१०/ प्र.क्र. २५/ जल-२०
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- १३ मे, २०१०.

वाचा:- ग्रामविकास व जलसंधारण विभागाचे शासन निर्णय
१.क्रमांक जसंप २००६/ प्र.क्र. ६३/ जल-२० दिनांक ३ जून, २००६.
२.क्रमांक जसंप २००९/ प्र.क्र २५/ जल-२० दिनांक १ जून, २००९.

प्रस्तावना:-

पाणलोट विकास प्रकल्पांवर एकापेक्षा अधिक समित्यांची/ मिशन्सची/ परिषदांची कार्यप्रणाली लक्षात घेऊन त्यामधे एकसूत्रता आणण्याच्या दृष्टीने व पाणलोट क्षेत्र विकासावर एकत्रित पणे सांगोपांग विचार करण्याच्या दृष्टीने मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन क्रमांक १ अन्वये महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेची पुनर्रचना करण्यात आली आहे. या परिषदेवर एकूण १२ अशासकीय सदस्य कार्यरत आहेत. या परिषदेची तीन वर्षांची मुदत संदर्भाधीन २ येथील शासन निर्णयान्वये पुढील निर्णय होईपर्यंत वाढविण्यात आली आहे. सदर परिषदेवर एका अतिरिक्त अशासकीय सदस्याची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

जलसंधारण कार्यक्रमाबाबत मार्गदर्शक धोरण, आढावा सनियंत्रण आणि कार्यक्रम अंमलबजावणीची दिशा ठरविण्याकरीता संदर्भाधिन दिनांक ३ जून, २००६ च्या शासन निर्णयान्वये मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेची पुनर्रचना करण्यात आली. या सल्लागार परिषदेचे श्री. विजय अण्णा बोराडे, उपाध्यक्ष असून एकूण १२ अशासकिय सदस्य या परिषदेवर नियुक्त करण्यात आले आहेत.

२. राज्यातील जलसंधारण कार्यक्रमाचे अनन्यसाधारण महत्व लक्षात घेवून सध्याचे धोरण अधिक प्रभावीपणे राबविण्यासाठी मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या या महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेची मुदत संदर्भाधीन २ येथील दिनांक १ जून, २००९ च्या शासन निर्णयान्वये पुढील निर्णय होईपर्यंत वाढविण्यात आली आहे.

........२

३. उपरोक्त महाराष्ट्र जलसंधारण सल्लागार परिषदेवर श्री. ज्ञानेश्वर सितारामजी ओले (पाटील), शेंद्री, ता. दारव्हा, जि. यवतमाळ यांची अशासकीय सदस्य म्हणून नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे. ही नियुक्ती हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांका पासून करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. संदर्भाधिन दिनांक ३ जून,२००६ च्या शासन निर्णयामधील परिच्छेद २ (इ) मध्ये नमूद केल्यानुसार शासनाच्या विहीत नियमांप्रमाणे अशासकीय सदस्यांना अनुज्ञेय असलेला प्रवासभत्ता व इतर भत्ते श्री. ज्ञानेश्वर सितारामजी ओले (पाटील) अशासकीय सदस्य यांना देखील अनुज्ञेय रहातील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००५१३१६२४५७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशांनुसार व नावाने.

**(मि. का. फडके)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. मुख्यमंत्री तथा अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.मंत्री (जलसंधारण व रोहयो) यांचे खाजगी सचिव.
मा.मंत्री (वने), सदस्य यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (जलसंपदा), सदस्य यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (महसूल), सदस्य यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (नियोजन व वित्त), सदस्य यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (ग्रामविकास), सदस्य यांचे खाजगी सचिव
उपाध्यक्ष,महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद यांचे स्वीय सहाय्यक.
मा.राज्यमंत्री (जलसंधारण), सदस्य यांचे स्वीय सचिव
मुख्य सचिव यांचे सचिव
अपर मुख्य सचिव (वने)
प्रधान सचिव (वित्त)
प्रधान सचिव (नियोजन )
प्रधान सचिव (आदिवासी विकास)
प्रधान सचिव (कृषि)
प्रधान सचिव (रोजगार व स्वयंरोजगार)
प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो)

सचिव (जलसंपदा)
सचिव (ग्रामविकास व पंचायत राज)
महासंचालक, यशदा, पुणे
आयुक्त (कृषि)
संचालक, वनामती
संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र नागपूर (रिमोट सेंन्सिंग सेंटर)
संचालक, सामाजिक वनीकरण, पुणे
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे
मुख्य अभियंता लघु पाटबंधारे (स्था.स्त.) पुणे
मा. श्री. अण्णा हजारे, प्रमुख मार्गदर्शक महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद
श्री. मुकुंद घारे, अफार्म, पुणे, अशासकीय सदस्य
श्री. मधुकर खडसे, धरामित्र, वर्धा. अशासकीय सदस्य
डॉ. डी. एस्. लोहिया, मानवलोक, जालना. अशासकीय सदस्य
डॉ. जयंतराव पाटील,बोर्डी, ठाणे, अशासकीय सदस्य
श्री. श्रीमंत माने, अकोला, अशासकीय सदस्य
श्री. फादर रॉबर्ट,अहमदनगर, अशासकीय सदस्य
श्री. प्रफुल्ल कदम, सांगोला, सोलापूर, अशासकीय सदस्य
श्रीमती सुरेखाताई ठाकरे, अमरावती, अशासकीय सदस्य
श्री. क्रीस्पीन लोबो, अहमदनगर, अशासकीय सदस्य
श्री. पोपटराव पवार, अहमदनगर, अशासकीय सदस्य
श्री. अरुण निकम, जळगाव, अशासकीय सदस्य
श्री. गिरीष गांधी, नागपूर, अशासकीय सदस्य
श्री. ज्ञानेश्वर ओले (पाटील), यवतमाळ, अशासकीय सदस्य

प्रत,
प्रधान सचिव (जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक
सर्व सहसचिव/उपसचिव (जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक
कार्यासन अधिकारी जल-७, ८, ११ व १२ ग्रामविकास व जलसंधारण विभाग
निवडनस्ती जल-२०